राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमांतर्गत २०७
अस्थायी पदांना मुदतवाढ मिळणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कुनिका२०१८/अपदे /प्र.क्र.२३५/आरोग्य-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २४ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :**

१) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः पदआ-२००७/११७/प्र.क्र.१९/सेवा-१, दि.६ ऑगस्ट, २००७
२) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः क्षनिका/अस्थायी पदे २०१०/प्र.क्र.३०५/आरोग्य-५, दि.२१/४/२०११
३) शासन शुध्दिपत्रक सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः क्षनिका/अस्थायी पदे २०१०/प्र.क्र.३०५/आरोग्य-५, दि.९/६/२०११
४) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः कुनिका/अपदे-२०१८/प्र.क्र.४४/ आरोग्य-५, दिनांक १३ एप्रिल, २०१८
५) वित्त विभाग, शा.क्र .नि.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०७ सप्टेंबर, २०१८
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे यांचे पत्र क्र.ससंआसे/ कुष्ठवक्षय/आस्था/कक्ष-९९/२०७ अस्थायी पदे/नक्र १६२/१०१८५-१८६/२०१७,दि.२/८/२०१८.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय कुष्ठरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत १०५४ पदे संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आली असून त्यापैकी ३८४ पदे अस्थायी ठेवण्यात आली. या ३८४ अस्थायी पदांपैकी संदर्भांकित क्रमांक २ व ३ च्या शासन निर्णयान्वये ८० % प्रमाणे १७७ अस्थायी पदे स्थायी करण्यात आली आहेत. उर्वरित २०७ अस्थायी पदांचा संदर्भांकित क्रमांक १ च्या शासन निर्णयानुसार मंजूर केलेल्या आस्थापनेच्या आढाव्यात समावेश आहे. संदर्भांकित क्र.४ च्या शासन निर्णयानुसार सदर २०७ अस्थायी पदांना दिनांक ३०/९/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आरोग्य विषयक सेवा सातत्याने उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने सोबत जोडलेल्या यादीतील २०७ अस्थायी पदे दिनांक १/१०/२०१८ ते दिनांक २८/२/२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर २०७ पदांमध्ये डॉ. बंदोरवाला लेप्रसी हॉस्पिटल, कोंढवा, पुणे येथील पदांचा समावेश आहे.

या पदांचा खर्च शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या विवरणपत्रातील पदनामांसमोर दर्शविण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१८-१९ साठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०७ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०२४११३३०९१२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Balkrishna Sadikale

Digitally signed by Ashok Balkrishna Sadikale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8bf4abca9cffe245f125a15e04c04845 88caf62e835869fb4d6f50064ebdcd69, serialNumber=fabaff613511cd50155bfbc69dd 29512e15f759a310be8ca8cb9522ad27ed9b9, cn=Ashok Balkrishna Sadikale
Date: 2018.10.24 11:50:56 +05'30'

**(अ. बा. सादिकले)**
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे-६.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), पुणे-१.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळे (सर्व).
५. प्रशासक, डॉ.बंदोरवाला कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे.
६. सहायक संचालक, आरोग्य सेवा सर्व (कुष्ठरोग).
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
११. वित्त विभाग, (व्यय-१३),(अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई-३२
१२. अवर सचिव, (सेवा २/३/५ व अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (आरोग्य-५).